बंदरातील भरीव गाळ उपसणी (३०५१ ०७३२) या योजनेसाठी सन २०२१-२२ मध्ये अर्थसंकल्पीत निधीपैकी रू.२०.३५ कोटी इतका निधी खर्च करण्यास मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीजीटी ०५२१/प्र.क्र.५१/बंदरे-२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ०३ डिसेंबर, २०२१

संदर्भ:-१. महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाचे पत्र क्र.ममेबो/साअचिस/यां.आ./२०५८,दि.११.०५.२०२१
२.महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाचे पत्र क्र.ममेबो/साअचिस/यांआ/३८२२,दि.१७.०९.२०२१
३.शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.०६.०४.२०२१
४. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१
५.शासन निर्णय, गृह विभाग,क्र.बीजीटी-०६२१/प्र.क्र.५५/बंदरे-२, दि.३०.०६.२०२१
६. प्रशासकीय मान्यतेचे आदेश जा.ममेबो/मुकाअ/साअचिस/गाळ उपसणी/२०२१-२२/३८२१ दि.१७.०९.२०२१
७. प्रशासकीय मान्यतेचे आदेश जा.ममेबो/मुकाअ/साचिअ/गाळ उपसणी/२०२१-२२/३८०३ दि.१६.०९.२०२१
८. प्रशासकीय मान्यतेचे आदेश जा.ममेबो/मुकाअ/साचिअ/गाळ उपसणी/२०२१-२२/३८०४ दि.१६.०९.२०२१
९. प्रशासकीय मान्यतेचे आदेश जा.ममेबो/मुकाअ/साचिअ/गाळ उपसणी/२०२१-२२/३८०६ दि.१६.०९.२०२१
१०. प्रशासकीय मान्यतेचे आदेश जा.ममेबो/मुकाअ/साचिअ/गाळ उपसणी/२०२१-२२/३८०५दि.१६.०९.२०२१

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडून राबविण्यात येणाऱ्या “बंदरातील भरीव गाळ उपसणी” या योजनेकरीता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षामध्ये अर्थसंकल्पीतकरण्यात आलेल्या रु.४०.६९ कोटी इतक्या रकमेपैकी वित्त विभाग शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/ प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४/६/२०२१ मधील तरतूदीनुसार सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पीय तरतूदीच्या ६०% च्या मर्यादेत रु.२४.४१ कोटीइतक्या निधीपैकी रु.२.८३ कोटी यापूर्वी दि.३०.०६.२०२१ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला असून उर्वरित निधीपैकी

रू.२०.३५ कोटी इतका निधी आता खालील कामांसाठी खर्च करण्यास मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांना मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे नाव | कामाचा अपेक्षित खर्च (कोटीमध्ये) |
|---|---|---|
| १. | मांडवा बंदरात गाळ उपसणी | ४.८२ |
| २ | मोरा बंदरातील गाळ उपसणी | ४.८९ |
| ३. | करंजा बंदरातील गाळ उपसणी | ४.६५ |
| ४ | रेवस बंदरातील गाळ उपसणी | ४.४० |
| ५. | मार्वे मनोरी बंदरातील गाळ उपसणी | १.५९ |
| | **एकूण** | **२०.३५** |

२. सदर निधी ज्या कामांकरीता वितरीत करण्यात येत आहे, त्याच कामांवर प्राप्त प्रशासकीय मान्यता /सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व विहित कालावधीत खर्ची पडेल, याबाबत आवश्यक ती दक्षता घेण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांची राहील.

३. सदर निधी खर्च करतांना वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०६.०४.२०२१ च्या परिपत्रकातील सूचनांचे व तरतुदींचे पालन करण्यात यावे. तसेच, सदरचा निधी कोणत्याही परिस्थितीत खर्च न होता बँक खात्यात, स्वीय प्रपंजी खात्यात अथवा शासकिय लेख्याबाहेर ठेवता येणार नाही.

४. सदरचा निधी दि.३१.०३.२०२२ पूर्वी खर्च करून खर्चाची उपयोगीता प्रमाणपत्रे शासनास सादर करण्यात यावी.

५. या वितरीत करावयाच्या तरतुदीकरीता आहरण व संवितरण अधिकारी म्हणून लेखाधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड तसेच नियंत्रक अधिकारी म्हणून मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड हे राहतील.

६. यासाठी होणारा खर्च “मागणी क्र. बी-७, ३०५१- बंदरे व दिपगृहे, ०० ०२ लहान बंदरे, (८०) सर्वसाधारण, (१९०), सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना सहाय्य, (०१) मेरीटाईम बोर्डास सहायक अनुदान, (०१) (०५) बंदरात मोठ्या प्रमाणात गाळ उपसणी

(राज्य) कार्यक्रम, ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) (३०५१ ०७३२)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा.

७. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या दि.०६.०४.२०२१ च्या शासन परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अ.क्र.९ मधील १ ते १० अटींची पूर्तता होत असल्याची खात्री करण्यात आली आहे. यापूर्वी महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास अदा करण्यात आलेल्या रू.२.८३ कोटीपैकी रू.२.८० कोटी इतका निधी खर्च केल्याचे उपयोगीता प्रमाणपत्र संदर्भाधीन दि.१७.०९.२०२१ च्या पत्रान्वये महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाने सादर केलेले आहे.

८. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या संदर्भ क्र. ११९/१४६१ दि.५.१०.२०२१ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.४०९/२०२१/व्यय-८, दि.१४.१०.२०२१ नुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२११२०३१४५४२८००२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhikan Onkar Thakur

Digitally signed by Bhikan Onkar Thakur
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cb64a92ffb1a1fc675b87b99d133c8e4ffed848f8ec9727d5082eb07dbbe3343, pseudonym=275A9F330CC9FDA3AC47ABC11C0D5C541DE78A2F, serialNumber=2CF77A3A2916BE200D3D9A0961DF4F9F77CC14E167C7FCEC2EA903E779A2239A, cn=Bhikan Onkar Thakur
Date: 2021.12.03 14:58:28 +05'30'

**( भि. ओं. ठाकूर )**
**कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), मुंबई.
२) वित्त विभाग (व्यय-८/अर्थसंकल्प-११), मंत्रालय, मुंबई-३२.
३) नियोजन विभाग (का. १४६१), मंत्रालय, मुंबई-३२.
४) प्रधान सचिव (बंदरे), गृह विभाग.
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८) कार्यासन अधिकारी, बीयुडी-१, गृह विभाग.